सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात राज्यातील कारागृहाकरीता शस्त्रे व दारुगोळा मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-०९१६/प्र.क्र.२३५/तुरुंग-२**

दुसरा मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०९ जानेवारी, २०१७

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक जेएलएम-१३१०/प्र.क्र.३०२/पीआरएस-२, दिनांक २२.२.२०११

२) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. इ.प्र.शस्त्र/प्र.मान्यता/७.६२एसएलआर-३/८७७७/कक्ष ६, दिनांक १२.९.२०१६

**शासन निर्णय :-**

राज्यातील कारागृह विभागासाठी नवीन शस्त्र धोरण राबविण्यासाठी वरील वाचा (१) येथील शासननिर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. सन २०१६-१७ च्या पावसाळी अधिवेशनात रुपये १,५०,०६,२११/- ( रुपये एक कोटी पन्नास लाख सहा हजार दोनशे एकरा फक्त) इतका निधी पुरवणीमागणीद्वारे अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर खर्चाच्या अंदाजपत्रकास शासन प्रशासकीय मान्यता व सदर निधी वितरीत करण्यात मान्यता देत आहे. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी खालील उपकरणांची खरेदी विहित अटी व शर्ती व प्रचलित कार्यपध्दतीनुसार व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार व विहित पद्धतीने करण्यात यावी.

राज्यातील कारागृहाकरीता लागणारा शस्त्र व दारुगोळा.

| अ.क्र. | शस्त्र व दारुगोळा | रक्कम रुपये | खरेदी करावयाच्या संस्थेचे नांव |
|---|---|---|---|
| १ | एसएलआर ७.६२ ( २२२ नग) | १,४८,७३,५५९.४८ | भारतीय शस्त्र निर्माण संस्था, तिरुचिरापल्ली, तामिळनाडू |
| २. | वाहतूक खर्च | १,३२,६५१.५२ | |
| | एकूण | १,५०,०६,२११.०० | |
| ( रुपये एक कोटी पन्नास लाख सहा हजार दोनशे एकरा फक्त) | | | |

२. या साठी होणारा खर्च मागणी क्रमांक बी-५,मुख्यलेखाशिर्ष -२०५६ तुरुंग,(००)(१०१) तुरुंग,(००) (०१) मध्यवर्ती तुरुंग, (२०५६००३५) दत्तमत (२२) शस्त्रे व दारुगोळा या लेखाशीर्षांखाली सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात उपलब्ध होणाऱ्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.०४.२०१६ च्या परिशिष्टात नमूद केलेल्या अटीस अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०९१७४६३६४४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Atmaram Sankhe

Digitally signed by Prabhakar Atmaram Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16ca9b273a3e790c4aab4c479015f44d506ae481c2dc55f48d889691ffa9939a, cn=Prabhakar Atmaram Sankhe
Date: 2017.01.09 17:50:49 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. कारागृह महानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य- १ मुंबई,
४. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य -१ मुंबई,
५. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य -२ नागपूर,
६. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य- २ नागपूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८. अवर सचिव, वित्त विभाग,(व्यय ८/अर्थसंकल्प ११) मंत्रालय, मुंबई-३२,
९. अवर सचिव (बीयुडी-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
१०.निवड नस्ती (तुरुंग-२).